**अपंग समावेशित शिक्षण योजना (माध्यमिक स्तर) अंतर्गत विशेष शिक्षकांच्या वेतनासाठी राज्य हिस्स्यापोटीचा निधी वितरीत करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आयईडीएसएस-२०१७/(३५६/१७)/टिएनटी-५

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १० ऑक्टोबर, २०१८.

**वाचा :-**

१. शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांकः आयइडीएस/२००९/(१६५/०९)/असंक, दिनांक ३१ ऑगस्ट, २००९.
२. शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांकः आयईडीएसएस-२०१७/(प्र.क्र.५७/१७)/टिएनटी-५, दिनांक ०८ नोव्हेंबर, २०१७.

**प्रस्तावना :-**

माध्यमिक स्तरावरील अपंग विद्यार्थ्यांना सामान्य विद्यार्थ्यांबरोबर शिक्षण घेता यावे या उद्देशाने केंद्र शासनाने २००९ मध्ये सुरु केलेली १००% केंद्र पुरस्कृत अपंग समावेशित शिक्षण योजना (माध्यमिक स्तर) अंतर्गत विशेष शिक्षकांची नियुक्ती करण्यात आलेली आहे. सन २०१५-१६ पासून सदर योजना ६० (केंद्र हिस्सा) : ४० (राज्य हिस्सा) करण्यात आली आहे. केंद्र शासनाने सन २०१५-१६ च्या या वर्षाकरिता पात्र ठरविलेल्या ८४० (५१२+३२८) विशेष शिक्षकांच्या वेतनासाठी राज्य शासनाच्या ४०% हिस्स्यापैकी दिनांक ०८.११.२०१७ च्या शासन निर्णयान्वये रु. १०७५ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला असून उर्वरित निधी वितरीत करण्याचीबाब शासनाच्या विचाराधीन होती..

तसेच, मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल करण्यात आलेल्या रिट याचिका क्र. ४५२/२०१५ मधील अवमान याचिका क्र. ३६९/२०१६ व त्यास संलग्न इतर अवमान याचिकांप्रकरणी मा. उच्च न्यायालयाने दिनांक ०५.०९.२०१८ व २५.०९.२०१८ रोजी दिलेल्या निर्देशानुसार सदर अवमान याचिकांशी संबंधीत सर्व रिट याचिकांकर्त्यांपैकी केंद्र शासनाने सन २०१६-१७ व सन २०१७-१८ च्या वेतनासाठी पात्र ठरविलेल्या विशेष शिक्षकांच्या (याचिकाकर्त्यांच्या) सन २०१६-१७ व २०१७-१८ या वित्तीय वर्षामधील वेतनावरील खर्च भागविण्यासाठी राज्य शासनाच्या ४०% हिस्स्यापोटीचा निधी वितरीत करण्याचीबाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

शासन या आदेशान्वये केंद्र शासनाने सन २०१५-१६ च्या वेतनासाठी पात्र ठरविलेल्या ८४० (५१२+३२८) विशेष शिक्षकांच्या सन २०१५-१६ या वित्तीय वर्षामधील वेतनावरील खर्च भागविण्यासाठी राज्य शासनाच्या ४०% हिस्स्यापोटीचे उर्वरित एकूण रुपये २७.०९ लक्ष (अक्षरी रुपये सत्तावीस लक्ष नऊ हजार फक्त) इतके अनुदान मंजूर करीत आहे.

२. तसेच, मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल करण्यात आलेल्या रिट याचिका क्र. ४५२/२०१५ मधील अवमान याचिका क्र. ३६९/२०१६ व त्यास संलग्न इतर अवमान याचिकांप्रकरणी मा. उच्च न्यायालयाने दिनांक ०५.०९.२०१८ व २५.०९.२०१८ रोजी दिलेल्या निर्देशानुसार सदर अवमान याचिकांशी संबंधीत सर्व रिट याचिकांकर्त्यांपैकी केद्र शासनाने सन २०१६-१७ व सन २०१७-१८ च्या वेतनासाठी पात्र ठरविलेल्या विशेष शिक्षकांच्या (याचिकाकर्त्यांच्या) सन २०१६-१७ व २०१७-१८ या वित्तीय वर्षामधील वेतनावरील खर्च भागविण्यासाठी राज्य शासनाच्या ४०% हिस्स्यापोटी रुपये १८५.१९ लक्ष (अक्षरी रुपये एक कोटी पंच्याऐंशी लक्ष एकोणीस हजार फक्त) इतके अनुदान मंजूर करीत आहे.

३. सदर खर्च मागणी क्रमांक लेखाशीर्ष ई - ३, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाज कल्याण, १०४, वृद्ध, विकलांग व निराश्रीत व्यक्तींचे कल्याण , (००) (०४) माध्यमिक स्तरावर विकलांग व्यक्तींसाठी एकात्मिक शिक्षण ( आयईडीएसएस ) ( राज्य हिस्सा ) ( कार्यक्रम ), (२२३५ बी८९१), ३६, सहायक अनुदाने (वेतन) " या लेखाशिर्षाखाली आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव/कार्यासन अधिकारी (रोख शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व सहसचिव /उपसचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना " नियंत्रक अधिकारी " म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर निधी अवर सचिव/कार्यासन अधिकारी (रोख शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी कोषागारातून काढून महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद सोसायटीच्या RMSA-IEDSS च्या बँक खात्यामध्ये तातडीने जमा करावा.

६. संबंधीत विशेष शिक्षकांना वेतन अदा करण्याची कार्यवाही राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा अभियान, चर्नीरोड, मुंबई यांनी करावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.७८७/१८/व्यय-५, दिनांक ०८.१०.२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१०१२०४५४०९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anand Narayanrao Bhondve

Digitally signed by Anand Narayanrao Bhondve
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a11586f7ebf5942c9727d91c8c251f01dab61da28a62264d92646e4dc3827d4d, cn=Anand Narayanrao Bhondve
Date: 2018.10.10 12:07:22 +05'30'

**( आ. ना. भोंडवे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग.
२) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) अवर सचिव/कार्यासन अधिकारी, रोख शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) कार्यासन अधिकारी, अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) शिक्षण संचालक (प्राथमिक)/(माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
६) उपसचिव, वित्त विभाग, कार्यासन कोषा- व्यय-५, अर्थसंकल्प-८, मंत्रालय, मुंबई.
७) राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा अभियान, चर्नीरोड, मुंबई.
८) उपसंचालक (लेखा), राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान, चर्नीरोड, मुंबई.
९) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१ व २ मुंबई/ नागपूर.
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ व २, मुंबई/ नागपूर.
११) संचालक, लेखा व कोषागारे, पुणे.
१२) वरिष्ठ कोषाधिकारी, जिल्हा पुणे.
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/ वांद्रे.
१४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१५) मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव.
१६) निवड नस्ती (टिएनटी-५).